# ।। मराठी आरती संग्रह ।।

## अनुक्रमणिका

**श्री गणेशाय नमः**

प्रारंभी विनती करू गणपती विद्यादयासागरा ।
अज्ञानत्व हरोनी बुद्धि मति दे आराध्य मोरेश्वरा ।
चिंता
-क्लेश
-दरिद्र
-दुःख अवघे देशांतरा पाठवी ।
हेरंबा गणनायका गजमुखा भक्तां बहू तोषवीं ।।

**श्री गणेश आरती १**

सुखकर्ता दु:खहर्ता वार्ता विघ्नाची ।
नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।
सर्वांगी सुंदर उटी शेंदूराची ।
कंठी झळके माळ मुक्ताफळाची ।।

जय देव जय देव जय मंगल मूर्ती ।
दर्शनमात्रे मन कामनापुर्ती ।। जय देव

रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा ।
चंदनाची ऊटी कुंकुम केशरा ।
हीरे जडित मुकुट शोभतो बरा ।
रुणझुणती नूपुरे चरणी घागरिया ।। जय देव

लंबोदर पीतांबर फणिवरबंधना ।
सरळ सोंड वक्रतुण्ड त्रिनयना ।
दास रामाचा वाट पाहे सदना ।
संकटी पावावे निर्वाणी रक्षावे
सुरवरवंदना ।। जय देव

- **समर्थ रामदासस्वामी**

**श्री गणेश आरती २**

नाना परिमळ दूर्वा शेंदुर शमिपत्रें ।
लाडू मोदक अन्ने परिपूरित पात्रें ।।
ऐसें पूजन केल्या बेएजाक्षर मंत्रें ।
अष्तहि सिद्धि नवनिधि देसी क्षणमात्रें ।। १।।
जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।।
तूझे गुण वर्णाया मज कैंची स्फूर्ती ।। धृ।।
तुझें ध्यान निरंतर जे कोणी करिती ।
त्यांची सकलहि पापें विघ्नेंही हरति ।।
वाजी वारण शिबिका सेवक सुत युवती ।
सर्वहि पावुनि अंतीं भवसागर तरती ।। जय देव ।। २।।
शरणागत सर्वस्वें भजती तव चरणीं ।
कीर्ति तयांची राहे जोंवरि शशि-तरणी ।।
त्रैलोक्यीं ते विजयी अद्भुत हे करणी ।
गोसावीनंदन रत नामस्मरणीं ।। जय देव।। ३।।

**श्री गणेश  आरती ३**

शेंदुर लाल् चढायो अच्छा गजमुखको ।
दोंदिल लाल् बिराजे सुत गौरिहरको ।
हाथ लिये गुडलड्डु सांई सुरवरको ।
महिमा कहे न जाय लागत हूं पदको ।। १ ।।

जय जय जी गणराज विद्या सुखदाता ।
धन्य तुम्हार दर्शन् मेरा मन रमता ।। धृ ।।

अष्टौ सिद्धी दासी संकटको बैरि ।
विघ्नविनाशन मंगल मूरत अधिकारी ।
कोटीसूरजप्रकाश ऐसी छबि तेरी ।
गंडस्थलमदमस्तक झूले शशिबिहारि ।। २ ।।

भावभगतसे कोई शरणागत आवे ।
संतत संपत सबही भरपूर् पावे ।
ऐसे तुम महाराज मोको अति भावे ।
गोसावीनंदन निशिदिन गुन गावे ।। ३ ।।

**- गोसाविनंदन**

**श्रीगणेश आरती ४**

कपोल झरती मदें शुण्डा बहु साजे ।
शेंदुर जो घवघवीत अद्भुत सुविराजे ।
घागरियांचा घोळ पदीं घुळघुळ वाजे ।
प्रसन्नवदना देवा ध्याना सुख माजे ।। १।।

जय देव जय देव गजनरवेषा ।
आरती ओवाळू तुजला विश्वेशा ।। धृ ।।

विशेष महिमा तुझा नकळे गणनाथा ।
हरिसी संकट विघ्ने तापत्रयव्यथा ।
अखण्ड आनंदे तू डोलविसी माथा ।
ताण्डवनृत्य करिसी तातक् धिम ताथा ।। जय ।। २।।

विद्या धनसंपदा कनकाच्या राशी ।
नारी सुत मंदिरे सर्वहि तू देशी ।
निर्वाणी पावशी वेगीं भक्तांसी ।
गोसावीनंदन गातो कवितांशी ।। जय ।। ३।।

**श्री गणेश आरती ५**

जय देव जय देव जय वक्रतुंडा ।
सिंदुरमंडित विशाळ सरळ भुजदंडा ।। जय ।। धृ ।।

प्रसन्नभाळा विमला करिं घेउनि कमळा ।
उंदिरवाहन दोंदिल नाचसि बहुलीला ।
रुणझुण करिती घागरिया घोळा ।
सतार सुस्वर गायन शोभित अवलीला ।। जय ।। १।।

सारीगमपधनीसप्तस्वरभेदा ।
धिमिकिट धिमिकिट मृदंग वाजति गतिछंदा ।
तातक् तातक् थैय्या करिसि आनंदा ।
ब्रह्मादिक अवलोकिती तव पदारविंदा ।। जय ।। २।।

अभयवरदा सुखदा राजिवदलनयना ।
परशांकुशलड्डूधर शोभित शुभवदना ।
ऊर्ध्वदोंदिल उंदिर कार्तिकेश्वर रचना ।
मुक्तेश्वर चरणांबुजिं अलिपरि करी भ्रमणा ।। जय ।। ३।।

**श्री दत्त आरती**

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा ।
त्रिगुणी अवतार त्रैलोक्य राणा ।
नेती नेती शब्द न ये अनुमाना ।
सुरवर मुनिजन योगे समाधी न ये ध्यान ।।
जय देव जय देव जय श्री गुरुदत्ता ।
आरति ओवाळीता हरली भवचिन्ता ।। जय देव

सबाह्य अभ्यंतरी तू एक् दत्त ।
अभाग्यासी कैसी नकळे ही मात ।
पराही परतली कैसा हा हेत ।
जन्म मरणाचा पुरलासे अंत ।। जय देव

दत्त येऊनीया उभा ठाकला ।
सद्भावे साष्टांगे प्रणिपात केला ।
प्रसन्न होउनीया आशीर्वाद दिधला ।
जन्मा मरणाचा फेरा वाचविला ।। जय देव
दत्त दत्त ऐसे लागले ध्यान ।
हरपले मन झले उन्मन ।
मी तू पणाची झाली बोळवण ।
एका जनार्दनी श्री दत्त ध्यान ।। जय देव

- **संत एकनाथ**

**श्री विठ्ठल आरती १**

युगे अठ्ठावीस विटेवरी ऊभा ।
वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा ।
पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आले गा ।
चरणी वाहे भीमा उद्धरी जगा ।।

जय देव जय देव जय पांडुरंगा ।
रखुमाई वल्लभा राईच्या वल्लभा ।
पावे जिवलगा ।।
जय देव

तुळसी माळा गळा कर ठेवुनी कटी ।
कासे पितांबर कस्तुरी लल्लाटी ।
देव सुरवर नित्य येती भेटी ।
गरुड हनूमंत पुढे उभे राहती ।।
जय देव

धन्य वेणुनाद अनुक्षेत्रपाळा ।
सुवर्णाची कमळे वनमाळा गळा ।
राई रखुमाबाइ राणीया सकळा ।
ओवाळू आरत्या विठोबा सावळा ।।
जय देव

ओवाळू आरत्या कुरवंड्या येती ।
चंद्रभागेमध्ये सोडुनिया देती ।
दिंड्या पताका वैष्णव नाचती ।
पंढरीचा महिमा वर्णावा किती ।।
जय देव

आषाढी कार्तिकी भक्तजन येती ।
चंद्रभागेमध्ये स्नान जे करती ।
दर्शन हेळामात्रे तया होय मुक्ती ।
केशवासी नामदेव भावे ओवाळिती ।। जय देव

- संत नामदेव

**श्री विठ्ठल आरती २**

येई हो विठ्ठले माझे माऊली ये ।
निढळावरी कर ठेवुनि वाट मी पाहे ।।धृ ।।

आलिया गेलिया हाती धाडी निरोप ।
पंढरपूरी आहे माझा मायबाप् ।। १ ।।

पिवळा पीतांबर् कैसा गगनी झळकला ।
गरुडांवरि बैसोनि माझा कैवारी आला ।। २ ।।

विठोबाचे राज्य आम्हां नित्य दिपवाळी ।
विष्णुदास नामा जीवेभावे ओंवाळी ।। ३ ।।

**- संत नामदेव**

**श्री विठ्ठल आरती ३**

ओवाळूं ग माये विठ्ठल सबाह्य साजिरा ।
राईरखुमाबाई सत्यभामेच्या वरा ।। धृ ।।

कनकाचे पर्येळी उजळोनी आरती ।
रत्नदीपशोभा कैशा प्रकाशल्या ज्योती ।। ओवाळूं ।। १।।

मंडित चतुर्भुज कानीं शोभत कुंडले ।
श्रीमुखाची शोभा पाहतां तेज फांकले ।। ओवाळूं ।। २।।

वैजयंती माळ गळा शोभे स्यमंत ।
शङ्खचक्रगदापद्म आयुधें शोभत ।। ओवाळूं ।। ३।।

सांवळा सुंदर जैसा कर्दळीचा गाभा ।
चरणीईंचीं नूपुरें वांक्या गाजती नभा ।। ओवाळूं ।। ४।।

ओवाळीता मन माझें ठाकलें ठायी ।
समाधिस्थसमान तुकया लागला पायी ।। ओवाळूं ।।५।।

**श्री विठ्ठल आरती ४**

आरती अनंतभुजा । विठो पंढरीराजा ।।
न चलती उपचार । मनें सारिली पूजा ।। धृ ।।

परेस पार नाहीं । न पडे निगमा ठायीं ।।
भुलला भक्तिभावें । लाहो घेतला देहीं ।। आरती ।। १।।

अनिर्वाच्या शुद्ध बुद्ध । उभा राहिला नीट ।।
रामाजनार्दनीं । पायीं जोडिली वीट ।। आरती ।। २।।

**श्री शंकर आरती १**

लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा ।
विषे कंठ काळा त्रिनेत्री ज्वाळा ।
लावण्य सुन्दर मस्तकी वाळा ।
तेथुनिया जळ निर्मळ वाहे झुळझुळा ।। जय देव
जय देव जय देव जय श्री शंकरा ।
आरती ओवाळू तुज कर्पुरगौरा ।। जय देव
कर्पुरगौरा भोळा नयनी विशाळा ।
अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा ।
विभुतीचे उधळण शितकंठ नीळा ।
ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ।। जय देव

देवी दैत्य सागर मंथन पै केले ।
त्यामाजी अवचीत हलहल जे उठले ।
ते त्वा असुरपणे प्राशन केले ।
नीळकंठ नाम प्रसिद्ध झाले ।। जय देव
व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी ।
पंचानन मनमोहन मुनिजन सुखकारी ।
शतकोटीचे बीज वाचे उच्चारी ।
रघुकुळटीळक् रामदासा अंतरी ।। जय देव

- **समर्थ रामदासस्वामी**

**श्री शंकर आरती २**

जय देव जय देव श्रीमंगेशा ।
पंचारति ओवाळू सदया सर्वेशा ।। धृ।।

सदया सगुणा शंभो अजिनांबरधारी ।
गौरीरमणा आद्या मदनांतकारी ।।
त्रिपुरारी अधहारी शिवमस्तकधारी ।
विश्वंभर विरुदे हें नम संकट धारीं ।। जय ।। १।।

भयकृत भयनाशन ही नामें तुज देवा ।
विबुधादिक कमळासन वांछिती तव सेवा ।।
तुझे गुण वर्णाया वाटतसे हेवा ।
अभिनव कृपाकटाक्षें मतिउत्सव द्यावा ।। जय ।। २।।

शिव शिव जपता शिव तू करिसी निजदासा ।
संकट वारी मम तूं करी शत्रुविनाशा ।।
कुळवृद्धीते पाववी हीच असे आशा ।
अनंतसुत वांछितसे चरणांबुजलेशा ।। जय ।। ३।।

**श्री शंकर आरती ३**

जय जय त्र्यंबकराज गिरिजानाथा गंगाधरा हो ।
त्रिशूल पाणी शंभो नीलग्रीवा शशिशेखरा हो ।।
वृषभारुढ फणिभूषण दशभुज पंचानन शंकरा हो ।
विभूतिमाळाजटा सुंदर गजचर्मांबरधरा हो ।। धृ ।।

पडलें गोहत्येचें पातक गौतमऋषिच्या शिरी हो ।
त्याने तप मांडिले ध्याना आणुनि तुज अंतरी हो ।।
प्रसन्न होऊनि त्यातें स्नाना दिधली गोदावरी हो ।
औदुंबरमुळी प्रगटे पावन त्रैलोक्यातें करी हो ।। जय ।। १।।

धन्य कुशावर्ताचा महिमा वाचे वर्णू किती हो ।
आणिकही बहुतीतें गंगाद्वारादिक पर्वती हो ।।
वंदन मार्जन करिती त्याचे महादोष नासती हो ।
तुझिया दर्शनमात्रे प्राणी मुक्तीतें पावती हो ।। जय ।। २।।

ब्रह्मगिरींची भावें ज्याला प्रदक्षिणा जरी घडे हो ।
तैं ते काया कष्टें जंव जंव चरणी रुपती खडे हो ।।
तंव तंव पुण्य विशेष किल्मिष अवघें त्याचें झडे हो ।
केवळ तो शिवरुपी काळ त्याच्या पाया पडे हो ।। जय ।। ३।।

लावुनिया निजभजनी सकळही पुरविसी मनकामना हो ।
संतति संपत्ति देसी अंती चुकविसी यमयातना हो ।।
शिव शिव नाम जपता वाटे आनंद माझ्या मना हो ।
गोसावीनंदन विसरे संसारयातना हो ।। जय ।। ४।।

**श्री विष्णूची आरती**

संतसनकादिक भक्त मिळाले अनेक ।
स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ।। १।।

नवल होताहे आरती देवाधिदेवा ।
स्वर्गींहुनी सुरवर पाहूं येती केशवा ।। धृ ।।

नर नारी तटस्थ टक पडिलें नयना ।
ओवाळीतां श्रीमुख धणी न पुरे मना ।। नवल ।। २।।

एका जनार्दनीं मंगल आरत्या गाती ।
मंगल कौतुकें गाती ।
मिळाले वैष्णव जयजयकारें गर्जती ।। नवल ।।३।।

**श्री व्यंकटेश आरती**

शेषाचल अवतार तारक तूं देवा ।
सुरवरमुनिवर भावें करिती जन सेवा ।।
कमळारमणा अससी अगणित गुण ठेवा ।
कमळाक्षा मज रक्षुनि सत्वर वर द्यावा ।। १ ।।

जय देव जय देव जय व्यंकटेशा ।
केवळ करुणासिंधू पुरवीसी आशा ।। धृ ।।

हें निजवैकुंठ म्हणुनि ध्यातों मी तूतें ।
दाखविसी गुण कैसे सकळिक लोकांते ।।
देखुनि तुझें स्वरूप सुख अद्भुत होतें ।
ध्यातों तुजला श्रीपति दृढ मानस होतें ।। जय ।। २ ।।

**श्री हनुमान आरती**

सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी
करि डळमळ भूमंडळ सिंधू जळ गगनी ।
कडाडिले ब्रह्मांड धाके त्रिभुवनी
सुरवर चर निशाचर त्या झाल्या पळनी ।। १।।

जय देव जय देव जय श्री हनुमंता
तुमचेनी प्रसादे नाभे कृतांता जय देव जय देव फ्रधृप्र

दुमदुमली पाताळे उठिला प्रतिशब्द
थरथरला धरणीधर् मानीला खेद ।
कडाडिले पर्वत उड्डगण् उच्छेद
रामी रामदासा शक्तिचा शोध ।। २।। जय देव

- **समर्थ रामदासस्वामी**

**श्री खंडोबाची आरती**

पंचानन हयवाहन सुरभूषितनीळा ।
खंडामंडित दंडित दानव अवलीळा ।।
मणिमल्लां मर्दुनियां जों धूसुर पिवळा ।
हिरे कंकण बासिंगे सुमनांच्या माळा ।। १।।

जय देव जय देव जय शिव मल्हारी ।
वारीं दुर्जन असुरां भवदुस्तर तारी ।। धृ ।।

सुरवर संवर वर दे मजलागी देवा ।
नाना नामे गाईन ही तुमची सेवा ।।
अघटित गुण गावया वाटतसे हेवा ।
फणिवर शिणला किती नर पामर केवा ।। जय ।। २।।

रघुवीरस्मरणी शंकर ह्रदयीं निवाला ।
तो हा मल्लंतक अवतार झाला ।।
यालागीं आवडे भाव वर्णिला ।
रामी रामदासा जिवलग भेडला ।। जय ।। ३।।

**श्री अनंताची आरती**

जय श्रीअनंता लक्ष्मीकांता आरती ओवाळू ।
भक्तां संकट पडतां धावे अनंत कनवाळू ।। धृ ।।

भाद्रपदमासी शुक्ल चतुर्दशी तव व्रत नेमाने ।
दुकूलदोरक करुनि पूजिति अनंत नामानें ।। १।।

नानापरिची पुष्पें द्रव्ये तुजला अर्पीती ।
षोडशपूजा करूनी द्वाह्मण संतर्पण करिती ।। २।।

अपूप वायान दंपतिपूजन त्या दिवशी करिती ।
अनंत सन्तुष्टोनि देती संतति संपत्ती ।। ३।।

रामा धर्मे आचरीतां व्रत क्लेशांतुनि सुटला ।
कौंडिण्याने पुजितां तुजला उद्धरिले त्याला ।। ४।।

मोरेश्वरसुत वासुदेव हा तिष्ठत सेवेसी ।
संकटकाळी रक्षी अनंता आपुल्या दासासी ।। ५।।

**श्री आत्मारामाची आरती**

नानादेहीं देव एक विराजे ।
नाना नाटकलीला सुंदर रूप साजे ।
नाना तीर्थी क्षेत्रीं अभिनव गति माजे ।
अगाध महिमा पिंड ब्रह्मांडीं गाजे ।। १।।

जय देव जय देव जय आत्मारामा ।
निगमागम शोधिता न कळे गुणसीमा ।। धृ ।।

बहुरूपी बहुगुणी बहुतां काळाचा ।
हरिहर ब्रह्मादिक देव सकळाचा ।
युगानुयुगीं आत्माराम आमुचा ।
दास म्हणे महिमा न बोलवे वाचा ।। जय ।। २।।

**आरती भुवनसुंदराची**

आरती भुवनसुंदराची । इंदिरावरा मुकुंदाची ।। धृ ।।

पद्मसम पादयुग्मरंगा । ओंवाळणी होति भृंगा ।
नखमणि श्रवताहे गंगा । जे कां त्रिविधतापभंगा ।।
फ्रचालप्र वर्तुळ गुल्फ भ्राजमाने । किंकिणीक्वणितरु
नाद घणघणितरु बांकिवर झुणितरु नेपुरें झनन
मंजिरीची । झनन ध्वनी मंजिरीची ।।१।। आरती भुवन

पीतपट हाटकतप्तवर्णी । कांची नितंबसुस्थानीं ।
नाभिची अगाध हो करणी । विश्वजनकाची जे जननी ।।
फ्रचालप्र त्रिवलीललित उदरशोभा ।
कुंबुगळां माळ विलम्बितरु झळाळ कौस्तुभरु
सरळ बाहु श्रिवत्स तरल मणि मरळ कंकणाची ।
प्रीति बहुरु जडित कंकणाची ।।२।। आरती भुवन

इंदुसम आस्य कुंदरदना । अधरारुणार्कबिंबवदना ।
पाहतां भ्रांति पडे मदना । सजलमेयब्धि दैत्यदमना ।।
फ्रचालप्र झळकत महरकुंडलाभा ।
कुटिल कुंतलींरु मयुरपत्रावली वेष्टिलीरु
तिलक भालिंरु केशरी झळाळित कृष्णकस्तुरीची ।
अक्षता काळि कस्तुरीची ।। ३।। आरती भुवन

कल्पद्रुमातळीं मूर्ती । सौदामिनी कोटिदिप्ती ।
गोपीगोपवलयभंवती ।
त्रिविष्टप पुष्पवृष्टि करिती ।।
फ्रचालप्र मंजुळ मधुर मुरलिनदें ।
चकित गंधर्वरु चकित अप्सरारु सुरागिरिवरारु
धरा कर्पुरारतीनें प्रेमयुक्त सची ।

आरती ओंवळित साची ।। ४।। आरती भुवन

वृंदावनिंचे विहरणि । सखे गे कृष्णमायबहिणी ।
श्रमलों भवाब्धिचे फिरणीं ।
आतां मज ठाव देई चरणीं ।।
फ्रचालप्र  अहा हे पूर्ण पुण्यश्लोका ।
नमितों चरण शरणरु मी करुणा येऊं दे विशालपाणीरु
कृष्ण नेणतें बाळ आपुलेंरु
राखि लाज याची ।। ५।। आरती भुवन

**दुर्गा आरती**

दुर्गे दुर्घटभारी तुजवीण संसारी ।
अनाथ नाथे अम्बे करुणाविस्तारी ।
वारी वारी जन्म मरणांते वारी ।
हारी पडलो आता संकट नेवारी ।। १।।

जय देवी जय देवी महिषासुरमथिनि ।
सुरवर ईश्वर वरदे तारकसंजीवनी ।। धृ।।

तुजवीण भुवनी पाहता तुज ऐसे नाही ।
चारी श्रमले परंतु न बोलवे काही ।
साही विवाद करिता पडले प्रवाही ।
ते तू भक्तालागी पावसि लवलाही ।। २।।

प्रसन्न वदने प्रसन्न होसी निजदासा ।
क्लेशांपासुनी सोडवी तोडी भवपाशा ।
अम्बे तुजवाचून् कोण पुरवील् आशा ।
नरहरी तल्लीन झाला पदपंकजलेशा ।। ३।।

- **नरहरी सोनार**

**आरती महालक्ष्मीची**

जयदेवी जयदेवी जय लक्ष्मीमाता ।
प्रसन्न होऊनिया वर देई आता ।। धृ ।।

विष्णुप्रिये तुझी सर्वांतरी सत्ता ।
धन दौलत देई लक्ष्मीव्रत करिता ।। १ ।।
विश्वव्यापक जननी तुज ऐसी नाही ।
धावसी आम्हालागी पावसी लवलाही ।। २ ।।
त्रैलोक्य धारिणी तू भक्ता लाभे सुखशांती ।
सर्व सर्वही दुःख सर्व ती पळती ।। ३ ।।
वैभव ऐश्वर्याचे तसेच द्रव्याचे ।
देसि दान वरदे सदैव सौख्याचे ।। ४ ।।
यास्तव अगस्ती बन्धु आरती ओवाळी ।
प्रेमे भक्तासवे लोटांगण घाली ।। ५ ।।

**श्रीसंतोषीमातेची आरती**

जय देवी श्री देवी संतोषी माते ।
वंदन भावें माझें तव पदकमलातें ।। धृ।।
श्रीलक्ष्मीदेवी तूं श्रीविष्णूपत्नी ।
पावसी भक्तालागीं अति सोप्या यत्नीं ।।
जननी विश्वाची तूं जीवन चिच्छक्ती ।
शरण तुला मी आलों नुरवी आपत्ती ।। १।।
भृगुवारीं श्रद्धेनें उपास तव करिती ।
आंबट कोणी कांहीं अन्न न सेवीती ।।
गूळ चण्याचा साधा प्रसाद भक्षीती ।
मंगल व्हावें म्हणुनि कथा श्रवण करिती ।। २।।
जे कोणी नरनारी व्रत तव आचरिती ।
अनन्य भावें तुजला स्मरुनी प्रार्थीती ।।
त्याच्या हांकेला तूं धांवुनिया येअसी ।
संतति वैभव कीर्ती धनदौलत देसी ।। ३।।
विश्वाधारे माते प्रसन्न तूं व्हावें ।
भवभय हरुनी आम्हां सदैव रक्षावें ।।
मनींची इच्छा व्हावी परिपूर्ण सगळी ।
म्हणुनी मिलिंदमाधव आरती ओवाळी ।। ४।।

**अंबा आरती**

सुखसदने शशिवदने अंबे मृगनयने ।
गजगमने सुरनमने कोल्हापुरमथने ।
सुरवर वर्षति सुमनें करुनियां नमनें ।
भयहरणे सुखकरणे सुंदरी शिवरमणे ।। १।।

जय देवी जय देवी वो जय अंबे ।
कोल्हापुराधिस्वामिणि तुज वो जगदंबे ।। धृ ।।

मृगमदमिश्रित केशर शोभत तें भाळीं ।
कुंचित केश विराजित मुगुटांतून भाळीं ।
रत्नजडित सुंदर अंगी कांचोळी ।
चिद्गगगनाचा गाभा अंबा वेल्हाळी ।। जय ।। २।।

कंठी विलसत सगुण मुक्ता सुविशेषें ।
पीतांबर सुंदर कसियेला कांसे ।
कटितटि कांची किंकिणि ध्वनि मंजुळ भासे ।
पदकमळ लावण्ये अंबा शोभतसे ।। जय ।। ३।।

झळझळझळझळ झळकति तानवडें कर्णी ।
तेजा लोपुनि गेले रविशशि निज करणीं ।
ब्रह्महरिहर सकळिक नेणति तव करणी ।
अद्भुत लीला लिहितां न पुरे ही धरणी ।। जय ।। ४।।

अष्टहि भूजा सुंदर शोभतसे ।
झगझगझगझगझगति लावण्यगाभा ।
म्हगम्हगम्हगम्हगम्हगीत समनांची शोभा ।।
त्र्यंबक मधुकर होऊनि वर्णितसे अंबा ।। ५।।

**नवरात्र आरती**

आश्विनशुद्धपक्षीं अंबा बैसली सिंहासनी हो ।
प्रतिपदेपासून घटस्थापना ती करूनि हो ।
मूलमंत्रजप करूनी भोवतें रक्षक ठेऊनि हो ।
ब्रह्माविष्णुरुद्र आईचे पूजन करिती हो ।। १।।

उदो बोला उदो अंबाबाई माऊलीचा हो ।
उदोकारे गर्जती काय महिमा वर्णू तिचा हो ।। धृ ।।

द्वितीयेचे दिवशी मिळती चौसष्ट योगिनि हो ।
सकळांमध्ये श्रेष्ठ परशुरामाची जननी हो ।।
कस्तुरीमळवट भांगी शेंदुर भरूनी हो ।
उदोकारें गर्जती सकळ चामुंडा मिळुनि हो ।। उदो ।। २।।

तृतीयेचे दिवशी अंबे शृंगार मांडिला हो ।
मळकट पातळ चोळी कंठी हार मुक्ताफळा हो ।।
कंठीची पदके कांसे पीतांबर पिवळा हो ।
अष्टभुजा मिरविती अंबे सुंदर दिसे लीला हो ।। उदो ।। ३।।

चतुर्थीचे दिवशी विश्वव्यापक जननी हो ।
उपासकां पाहसी अंबे प्रसन्न अंतःकरणीं हो ।।
पूर्ण कृपें पाहसी जगन्माते मनमोहिनी हो ।
भक्तांच्या माऊलि सुर ते येती लोटांगणी हो ।। उदो ।। ४।।

पंचमीचे दिवशीं व्रत तें उपांगललिता हो ।
अर्घ्यपाद्यपूजनें तुजला भवानी स्तविती हो ।।
रात्रीचे समयी करिती जागरण हरिकथा हो ।
आनंदें प्रेम तें आलें सद्भावें क्रीडता हो ।। उदो ।। ५।।

षष्ठीचे दिवशी भक्तां आनंद वर्तला हो ।
घेऊनि दिवट्या हस्ती हर्षे गोंधळ घातला हो ।।
कवडी एक अर्पितां देसी हार मुक्तफलांचा हो ।
जोगवा मागतां प्रसन्न झाली भक्तकुळा हो ।। उदो ।। ६ ।।

सप्तमीचे दिवशी सप्तशृंगगडावरी हो ।
तेथें तूं नांदसी भोवतें पुष्पें नानापरी हो ।।
जाईजुईशेवंती पूजा रेखियली बरवी हो ।
भक्तसंकटी पडतां झेलूनि घेसी वरचे वरी हो ।। उदो ।। ७ ।।

अष्टमीचे दिवशी अष्टभुजां नारायणी हो ।
सह्याद्रीपर्वती पाहिली उभी जगज्जननी हो ।।
मन माझें मोहिलें शरण आलों तुजलागुनी हो ।
स्तनपान देऊनि सुखी केली अंतःकरणीं हो ।। उदो ।। ८ ।।

नवमीचे दिवशीं नवदिवसांचें पारणें हो ।
सप्तशतीजप होम हवनें सद्भक्ती करूनी हो ।।
षड्रस अन्न नैवेद्यासी अर्पियली भोजनी हो ।
आचार्यब्राह्मणां तृप्त केलें कृपेंकरूनी हो ।। उदो ।। ९ ।।

दशमीच्या दिवशी अंबा निघे सीमोल्लंघनी हो ।
सिंहारूढे दारुण शस्त्रें अंबे त्वां घेऊनी हो ।।
शुंभनिशुंभादिक राक्षसा किती मारिसी रणी हो ।
विप्रा रामदासा आश्रय दिधला तो चरणी हो ।। उदो ।। १० ।।

**श्रीगीतेची आरती**

जय देवी जय देवी जय भगवद्गीते ।
आरती ओवाळूं तुज वेदमाते ।। धृ।।

सुखकरणी दुखहरणी जननी वेदांची ।
अगाध महिमा तुझा नेणे विरंची ।।
ते तूं ब्रह्मी होतिस लीन ठायींची ।
अर्जुनाचें भावें प्रकट मुखींची ।। जय ।। १।।

सात शतें श्लोक व्यासोक्तीसार ।
अष्टादश अध्याय इतुका विस्तार ।।
अर्ध पाद करितां उच्चार ।
स्मरणमात्रें त्यांच्या निरसे संसार ।। जय ।। २।।

काय तुझा पार नेणें मी दीन ।
अनन्यभावें तुजला आलों मी शरण ।।
सनाथ करीं माये कृपा करून ।
बापरखुमादेवीवरदासमान ।। जय ।। ३।।

**गंगामाईची आरती**

माते दर्शनमात्रें प्राणी उद्धरिसी ।
हरिसी पातक अवघें जग पावन करिसी ।।
दुष्कर्मी मी रचिल्या पापांच्या राशी ।
हर हर आतां स्मरतों मति होईल कैसी ।। १ ।।

जय देवी जय देवी जय गंगाबाई ।
पावन करि मज सत्वर विश्वाचे आई ।। धृ ।।

पडले प्रसंग तैशी कर्मे आचरलों ।
विषयांचे मोहानें त्यातचि रत झालों ।।
त्याचे योगे दुष्कृत सिंधूत बुडालों ।
त्यांतुनि मजला तारिसि ह्या हेतूनें आलों ।। जय ।। २ ।।

निर्दय यमदुत नेती त्या समयीं राखीं ।
क्षाळीं यमधर्माच्या खात्यातील बाकी ।।
मत्संगति जन अवघे तारियले त्वां की ।
उरलो पाहें एकचि मी पतितांपैकी ।। जय ।। ३ ।।

अघहरणे जय करुणे विनवितसे भावें ।
नोपेक्षी मज आतां त्वत्पात्रीं घ्यावें ।।
केला पदर पुढे मी मज इतकें द्यावें ।
जीवे त्या विष्णूच्या परमात्मनि व्हावें ।। जय ।। ४ ।।

**मनोबोधाची आरती**

वेदांचें जें गुह्य शास्त्रांचें जें सार ।
प्राकृत शब्दांमाजी केला विस्तार ।
कर्म उपासना ज्ञान गंभीर ।
ज्याच्या मननमात्रें आत्मा गोचर ।।
जय देव जय देव जय मनोबोधा ।
पंचप्राणें आरति तुज स्वात्मशुद्धा ।।
जय देव जय देव ।।

दोन शतें पांच श्लोक हे जाण ।
श्रवणें अर्थें साधक पावति हे खूण ।।
परमार्थासी सुलभ मार्ग हा पूर्ण ।
यशवंत सद्गुरु दासाचा प्राण ।।
जय देव जय देव ।।

**श्री सत्यनारायणाची आरती**

जय जय दीनदयाळ सत्यनारायण देवा ।
पंचारति ओवाळूं श्रीपति तुज भक्तिभावा ।। धृ।।
विधियुक्त पूजुनी करिती पुराण श्रवण ।
परिमळद्रव्यांसहित पुष्पमाळा अर्पून ।।
घृतयुक्त शर्करामिश्रित गोधूमचूर्ण ।
प्रसाद भक्षण करितां प्रसन्न तूं नारायण ।। जय ।। १।।
शतानंद विप्रें पूर्वी व्रत हें आचरिलें ।
दरिद्र दवडुनि अंतीं त्यातें मोक्षपदा नेलें ।।
त्यापासुनि हें व्रत या कलियुगिं सकळां श्रुत झालें ।
भावार्थें पूजितां सर्वां इच्छित लाधलें ।। जय ।। २।।
साधुवैश्यें संततिसाठीं तुजला प्रार्थियलें ।
इच्छित पुरतां मदांध होऊनि व्रत न आचरिलें ।।
त्या पापानें संकटिं पडुनी दु:खहि भोगिलें ।
स्मृति होऊनि आचरितां व्रत त्या तुवांचि उद्धरिलें ।। जय ।। ३।।
प्रसाद विसरुनि पतिभेटीला कलावती गेली ।
क्षोभ तुझा होतांचि तयाची नौका बुडाली ।।
अंगध्वजरायाची यापरि दु:खस्थिति आली ।
मृतवार्ता शतपुत्रांची सत्वर कर्णी परिसली ।। जय ।। ४।।
पुनरपि पूजुनि प्रसाद ग्रहण करितां तत्क्षणीं ।
पतिची नौका तरली देखे कलावती नयनीं ।।
अंगध्वजरायासी पुत्र भेटति येऊनि ।
ऐसा भक्तां संकटिं पावसि तूं चक्रपाणी ।। जय ।। ५।।
अनन्यभावें पूजुनि हें व्रत जे जन आचरति ।
इच्छित पुरविसी त्यांतें देउनि संतति संपत्ती ।।
संहरती भवदुरितें सर्वहि बन्धनें तुटती ।
राजा रंका समान मानुनि पावसी श्रीपती ।। जय ।। ६।।
ऐसा तव व्रतमहिमा अपार वर्णूं मी कैसा ।
भक्तिपुरस्सर आचरती त्यां पावसि जगदीशा ।।

भक्तांचा कनवाळू कल्पद्रुम तूं सर्वेशा ।
मोरेश्वरसुत वासुदेव तुज विनवी भवनाशा ।। जय ।।७।।

**पसायदान**

आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनि मज् द्यावे । पसायदान् हे ।।

जे खळांचि व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रति वाढो ।
भूता परस्परे पडो । मैत्र जीवांचे ।।

दुरितांचे तिमिर् जावो । विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ।
जो जे वांछील् तो ते लाहो । प्राणिजात् ।।

वर्षत् सकळ् मंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत् भूमंडळी । भेटतु भूता ।।

चला कल्पतरुंचे अरव् । चेतना चिंतामणीचे गाव् ।
बोलते जे अर्णव् । पीयूषाचे ।।

चंद्रमे जे अलांछन् । मार्तंड् जे तापहीन् ।
ते सर्वांही सदा सज्जन् । सोयरे होतु ।।

किंबहुना सर्वसुखी । पूर्ण होउनि तिहीं लोकी ।
भजीजो आदिपुरुखी । अखंडित् ।।

येथ् म्हणे श्रीविश्वेश्वरावो । हा होईल् दान् पसावो ।
येणे वरे ज्ञानदेवो । सुखिया झाला ।।

- **संत ज्ञानेश्वर**

**श्री कृष्णाची आरती १**

ओंवाळूं आरती मदनगोपाळा ।
श्यामसुंदर गळा वैजयंतीमाळा ।। धृ।।
चरणकमल ज्याचे अति सुकुमार ।
ध्वजवज्राङ्कुश ब्रीदाते तोडर ।। १।।
नाभिकमलीं ज्याचें ब्रह्मयाचें स्थान ।
हृदया पदक शोभे श्रीवत्सलांछन ।। २।।
मुखकमल पाहातां सूर्याच्याकोटी ।
मोहियेलें मानस कोंदियली दृष्टी ।। ३।।
जडितमुगुट ज्याच्या देदीप्यमान ।
तेणें तेजें कोंदलें अवघे त्रिभुवन ।। ४।।
एका जनार्दनीं देखियेले रूप ।
रूप पाहों जातां झालेसें तद्रूप ।। ५।।

**श्रीकृष्णाची आरती २**

हरि चला मंदिरा ऐशा म्हणती गोपिका म्हणती राधिका ।
भावें ओवाळिती यदुकुलतिलका ।। धृ ।।

एकीकडे राई  एकीकडे रखुमाई ।
भावे ओवाळिता हरिसी तूं होसी दो ठाईं ।। हरि।। १।।

अष्टाधिक सोळा सहस्त्र ज्याच्या सुंदरा  ज्याच्या सुंदरा ।
जिणे जिणें प्रार्थिलें जासी तियेच्या घरा ।। हरि ।। २।।

एका जनार्दनी हरी तूं लाघवी होसी ।
इतक्याही भोगुनी ब्रह्मचारी म्हणवीसी ।। हरि ।। ३।।

**श्रीकृष्णाची आरती ३**

अवतार गोकुळी हो । जन तारावयासी ।
लावण्यरुपडे हो । तेज:पुंजाळ राशी ।
उगवले कोटिबिंब । रवि लोपला शशी ।
उत्साह सुरवरां । महाथोर मानसी।। १।।

जय देवा कृष्णनाथा । राईरखुमाई कांता ।
आरती ओवाळीन । तुम्हा देवकीसुता ।। धृ ।।

कौतुक पहावया । भाव ब्रह्मयाने केली ।
वत्सेंही चोरूनिया । सत्यलोकासी नेलीं ।
गोपाल गाईवत्सें । दोन्ही ठाई रक्षिली ।
सुखाचा प्रेमसिंधू । अनाथांची माऊली ।। २।।

चोरितां गोधनें हो । इन्द्र कोपला भारी ।
मेघ कडाडिला । शिला वर्षल्या धारी ।
रक्षिले गोकुळ हो । नखीं धरिला गिरी ।
निर्भय लोकपाळ । अवतरला हरी ।। ३।।

वसुदेव देवकीचे । बंद फोडिली शाळ ।
होऊनिया विश्वजनिता । तया पोटिंचा बाल ।
दैत्य हे त्रासियेले । समुळ कंसासी काळ ।
राज्य हें उग्रसेना । केला मथुरापाळ ।। ४।।

तारिले भक्तजन । दैत्य सर्व निर्दाळून ।
पांडवा साहाकारी । अडलिया निर्वाणी ।
गुण मी काय वर्णु । मति केवढी वानूं ।
विनवितो दास तुका । ठाव मागे चरणी ।। ५।।

**श्रीकृष्णाची आरती ४**

सहस्त्रदीपें दीप कैसी प्रकाशली प्रभा ।
उजळल्या दशदिशा गगना आलीसे शोभा ।। १।।

कांकड आरति माझ्या कृष्ण सभागिया ।
चराचर मोहरलें तुझी मूर्ती पहाया ।। धृ।।

कोंदलेंसे तेज प्रभा झालीसे एक ।
नित्य नवा आनंद ओंवाळितां श्रीमुख ।। २।।

आरति करितां तेज प्रकाशलें नयनीं ।
तेणें तेजें मीनला एका एकीं जनार्दनीं ।। ३।।

**श्री कृष्णाची आरती ५**

ऐकोनी कृष्णकीर्ती मन तेथें वेधलें ।
सगुणरूप माये माझ्या जीवीं बैसलें ।
तें मज आवडतें अनुमान न बोले ।
पाहावया रूप याचें उतावीळ हो झालें ।। १।।

यालागीं आरती हो कृष्णा पाही हो सखी ।
आणिक नावडे हो दुजे तिहीं हो लोकीं ।। धृ।।

पाऊल कृष्णजीचें माझ्या जीवीं बैसलें ।
सनकादिक पाहा महा आसक्त झाले ।
मुक्त जो शुकमुनी तेणें मनीं धरिलें ।
तें मी केवीं सोडूं मज बहू रुचलें ।। २।।

निर्गुण गोष्टि माये मज नावडे साचें ।
सगुण बोल कांहीं केव्हां आठवी वाचें ।
पाया लागेन तूझ्या हेंचि आर्त मनींचें ।
तेणें घडेल दास्य रमावल्लभाचें ।। ३।।

**भागवताची आरती**

जयदेव जयदेव श्रीमद्भागवता ।
श्रवणें मननें पठणें भक्ती ये हाता ।। धृ ।।

वेदाचें हें सार पाहे रसभरित ।
दशलक्षण हें आहे लक्षीत ।। जय ।। १।।

द्वादश स्कंधामध्यें हरीची लीळा ।
तिनशें पस्तिस अध्ये गाती गोपाळा ।। जय ।। २।।

अठरा सहस्त्र श्लोक गाती ऐकती ।
ज्यासी हरीभक्ती त्यासी तत्प्राप्ती ।। जय ।। ३।।

गायत्रीचें मंत्ररूप हें पाहें ।
परीक्षिति-शुकसंवाद आहे ।। जय ।। ४।।

भागवतरूपी देवा तूंचि अहेसी ।
करूं ही आरति एका-जनार्दनासी ।। जय ।। ५।।

**आरती साईनाथांची**

जय देव जय देव जय साईनाथा ।। श्री सद्गुरुनाथा ।।
विश्वंभरा विश्वेशा ।तारक तू जगता ।। धृ।।
ब्रह्माण्डाचा नायक देवा तू कळले ।
प्रत्यय निजभक्तांचे अद्भुत दावियेले ।।
ब्रह्मा विष्णु शङ्कर गणपती तू त्राता ।
भजतां तव पदकमला हरिसी भवचिंता ।। १।।
हरूनि दारिद्र्याते रंका रक्षियले ।
रोगग्रस्तां तुझिया उदिनें तारियले ।।
वांझेसी तोषविलें देऊनिया पुत्रा ।
जो जो वांछिल त्यांचा तू अससी दाता।। २।।
ज्ञानरवी तू दिधले ज्ञान अज्ञाना ।
सन्मार्गा लावुनिया उद्धरिले त्यांना ।।
ऐशी तू सकलांची ममताळू माता ।
रोमांचित तनु होई गुण महिमा गातां ।। ३।।
यमपाशा तोडुनी तू भक्त सोडविले ।
आयुर्बल देऊनि त्या सकला तोषविले ।।
ऐसे सामर्थ्याचे प्रताप तव गातां ।
शिणली मति मग आलों शरण तुला नाथा ।। ४।।
मद्वचनी विश्वासुनि जे सेवा करिती ।
त्यांची चिंता लागे रात्रंदिन मजसी ।।
ऐसे दृढ आश्वासन दिधलेसी जगता ।
करुणेचा सागर तू अससी गुरुनाथा ।। ५।।
समतेची योगाची मूर्ती श्री साई ।
ऋद्धिसिद्धी घेती लोळण तव पायीं ।।
अंतर साक्षी तुजला सर्वांची वार्ता ।
अगम्य तुजला कांहीं ऐसा तू ज्ञाता ।। ६।।
लाभे फळ करितां तव नवस समाधीला ।
दाखविसी अद्यापी निज साद लीला ।।

चुकतां पथ दर्शविसी देउनि दृष्टांता ।
हीना दीनांचा तू स्वामी हितकर्ता ।। ७।।
जन्मोजन्मी मजला घडुं दे श्रीदेवा ।
आशीर्वचनाची तव लाभो मज सेवा ।।
घालुनिया लोटांगण याचितसे नाथा ।
पापात्मा मी यास्तव लोटुं नका परता ।। ८।।

**श्री सद्गुरुंची आरती १**

सगुण हे आरती निर्गुण ओंवाळूं ।
कल्पनेचें घृत घालूं दीप पाजळूं ।। १।।

ओंवाळूं आरती सद्गुरुनाथा श्रीगुरुनाथा ।
भावें चरणकमळावरी ठेविला माथा ।। धृ ।।

अविद्येचा मोह पडला उपडोनी सांडूं ।
आशा मनशा तृष्णा काम क्रोध कुरवंडू ।। आरती ।। २।।

सद्गुरूचे पूजन केले षोडशोपचारे ।
रामानंद जीवन्मुक्त झाला संसारी ।। आरती ।। ३।।

**श्री सद्गुरुंची आरती २**

फळलें भाग्य माझें धन्य झालों संसारी ।
सद्गुरु भेटला हो तेणें धरियेलें करीं ।।
पश्चिमे चालवीलें आत्मस्तुती निर्धारीं ।
त्रिकुटावरी नांद देखियेला पंढरी ।। १ ।।

तें सुख काय सांगूं वाचे बोलता न ये ।
आरतिचेनि गुणें गेलें मीपण माये ।। धृ ।।

राउळामाजीं जातां राहे देह अवस्था ।
मन हें उन्मन झालें नसे बद्धतेची वार्ता ।।
हेतु हा मावळला शब्दा आली निःशब्दता ।
तटस्थ होऊनि ठेलों नीजरूप पहातां ।। २ ।।

त्रिगुण गुण बाई पूर्ण जळत्या वाती ।
नवलाव अविनाश न समायें समंज्योती ।।
पाहतां लक्ष तेथें हालूं विसरली पातीं ।
नातुडे माझें नाही दिवसराती ।। ३ ।।

आरती सद्गुरुचि उजळली अंतरीं ।
प्रकाश थोर झाला सांठवेना अंबरी ।।
रविशशि मावळले तया तेजामाझारीं ।
वाजती दिव्य वाद्यें अनुहाते गजरी ।। ४ ।।

आनंदसागरांत प्रेमें दीधली बुडी ।
लाधलें सौख्य मोठें न ये बोलीं ।।
सद्गुरुचेनि संगें ऐसी आरती केली ।
निवृत्तीनें आनंदाची तेथे वृत्ति निमाली ।। ५ ।।

**श्री सद्गुरुंची आरती ३**

धन्य धन्य हे प्रदक्षिणा सद्गुरुरायाची ।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची ।। धृ ।।

पदोपदीं अपार झाल्या पुण्याच्या राशी ।
सर्वही तीर्थें घडलीं आम्हा आदिकरुनि काशी ।। १ ।।

मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थें गाती ।
नामसंकीर्तनें ब्रह्मानंदें नाचती ।। २ ।।

कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत ।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ।। ३ ।।

गुरुभजनाचा महिमा न कळे आगमा-निगमांसी ।
अनुभव ते जाणती जे गुरुपदिंचे रहिवासी ।। ४ ।।

प्रदक्षिणा करूनि देह भावें वाहिला ।
श्रीरंगात्मज विठ्ठल पुढें उभा राहिला ।। ५ ।।

**श्री रामचंद्रांची आरती १**

उत्कट साधुनि शिळा सेतु बांधोनी ।
लिंगदेह लंकापुर विध्वंसूनी ।।
कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी ।
देह अहंभाव रावण निवटोनी ।। १।।

जय देव जय देव निजबोधा रामा ।
परमार्थें आरती सद्भावें आरती परिपूर्णकामा ।। धृ ।।
प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला ।

लंका दहन करुनी अखया मारिला ।।
मारिला जंबूमाळी भुवनी त्राहाटीला ।
आनंदाची गुढी घेऊनियां आला ।। जय ।। २।।

निजबळें निजशक्ति सोडविली सीता ।
म्हणूनि येणें झालें अयोध्ये रघुनाथा ।।
आनंदें वोसंडे वैराग्य भरता ।
आरती घेऊन आली कौसल्या माता ।। जय ।। ३।।

अनाहतध्वनी गर्जती अपार ।
अठरा पद्में वानर करिती भुभु:कार ।।
अयोध्येसी आले दशरथकुमार ।
नगरीं होत आहे आनंद थोर ।। ।। जय ।। ४।।

सहज सिंहासनीं राजा रघुवीर ।
सोऽहंभावें तया पूजा उपचार ।।
सहजांची आरती वाद्यांचा गजर ।
माधवदासा स्वामी आठव ना विसर ।।
जय देव जय देव निजबोधा रामा ।
परमार्थे आरती सद्भावें आरती परिपूर्णकामा ।। ५।।

**श्रीरामचंद्रांची आरती २**

त्रिभुवनमंडित माळ गळां । आरति ओवाळू पाहूं ब्रह्मपुतळा ।। १।।
श्रीराम जयराम जयजय राम । आरति ओंवाळूं पाहूं सुंदर मेघश्याम ।। धृ ।।

ठकाराचे ठाण वारीं धनुष्य बाण । मारुती सन्मुख उभा कर जोडून ।। २।।

भरतशत्रुघ्न दोघे चामर ढाळिती । स्वर्गाहून देव पुष्पवृष्टी करीती ।। ३।।

रत्नजडित हार वर्णू काय मुकुटी । आरती ओंवाळूं चौदा भुवनांच्या कोटी ।। ४।।

विष्णुदास नामा म्हणे मागतो तूतें । आरती ओंवाळूं पाहूं सीतापतीतें ।। ५।।

**श्री रामचंद्रांची आरती ३**

स्वस्वरूपोन्मुबुद्धि वैदेही नेली ।
देहात्मकाभिमानें दशग्रीवें हरिली ।
सद्विवेकमारूतिनें तच्छुद्धि आणिली ।
तव चरणांबुजि येऊनि वार्ता श्रुत कली ।। १।।

जय देव जय देव जय निजबोधा रामा ।
परमार्थे आरती सद्भावें आरती परिपूर्णकामा ।। धृ ।।

उत्कट साधुनि शिळा सेतु बान्धोनि ।
लिंगदेहलंकापुरी विद्धवंसोनी ।
कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी ।
देह अहंभाव रावण निवटोनि ।। जय ।। २।।

प्रथम सीताशोधी हनुमन्त गेला ।
लंकादहन करूनी सखया मारीला ।
वधिला जंबूमाळी भुवनी त्राहटीला ।
आनंदाची गुढी घेऊनिया आला ।। जय ।। ३।।

निजबळें निजशक्ती सोडविली सीता ।
म्हणुनी येणें झाले अयोध्ये रघुनाथा ।
आनंदे ओसंडे वैराग्य भरता ।
आरती घेऊनि आली कौसल्या माता ।। जय ।। ४।।

अनुहत वाजिंत्रध्वनि गर्जती अपार ।
अठरा पद्मे वानर करिती भुभुःकार ।
अयोध्येसी आले दशरथ कुमार ।
नगरी होत आहे आनंद थोर ।। जय ।। ५।।

सहज सिंहासनी राजा रघुवीर ।
सोहंभावें तया पूजा उपचार ।
सहजांची आरती वाद्यांचा गजर ।
माधवदासस्वामी आठव ना विसर ।। जय ।। ६ ।।

**श्री रामचंद्रांची आरती ४**

रत्नांची कुंडलें माला सुविराजे ।
झळझळ गंडस्थळ घननीळ तनू साजे ।
घंटा किंकिणि अंबर अभिनव गति साजे ।
अंदु वांकी तोडर नुपुर ब्रीद गाजे ।। १।।

जय देव जय देव जय रघुवर ईशा ।
आरती निर्जरवर ईशा जगदीशा ।। धृ ।।

राजिव लोचन मोचन सुरवर नरनारी ।
परातपर अभयंकर शंकर वरधारी ।
भूषणमंडित उभा त्रिदश कैवारी ।
दासा मंडण खंडण भवभय अपहारी ।। जय देव ।। २।।

**श्री रामचंद्रांची आरती ५**

काय करूं गे माय आतां कवणा ओंवाळूं ।
जिकडे पाहे तिकडे राजाराम कृपाळू ।। धृ ।।

ओंवाळूं गे माय निजमूर्ति रामा ।
रामरूपी दुजेपणा न दिसे आम्हा ।। १।।

सुरवर नर वानर अवघा राम सकल ।
दैत्य निशाचर तेही राम केवळ ।। २।।

त्रैलोक्यस्वरूपें राम संचारला एक ।
सद्गुरुकृपें केशवराजी आनंद देख ।। ३।।

**परशुरामांची आरती**

जमदग्नीकुळभूषण मुक्ता फळदशना ।
अतिसज्जन मनमोहनरजनीकरवदना ।
अगणित महिमा तुझा न कळे सुरगणा ।
वदतो कंठी वाणी सरसीरुहनयना ।। १।।

जय राम श्रीराम जय भार्गवरामा ।
नीरांजन करूं तुजला परिपूर्णकामा ।। धृ ।।

सह्याद्रिगिरिशिखरीं शर घेऊनी येसी ।
सोडुनी शर पळवीसी पश्चिमजलधीसी ।
तुजसम रणधीर जगी न पडे दृष्टीसी ।
प्रताप थोर तुझा न कळे कवणासी ।। जय ।। २।।

तव कोप बहु पापी बा संहारी ।
दानव दहन करोनी वससी गिरिशिखरी ।
क्षत्रिय मारूनि अवनी केली निर्वैरी ।
सात्विक राजस तामस त्रिगुणां उद्धरी ।। जय ।। ३।।

दृढ भावे तव वंदन करिती जे चरणी ।
त्यांचे भवभय नाही जंववरि शशितरणी ।
शर मारुनी उद्भवली गंगा जनतरणी ।
चिंतामणि शरणागत निश्चल तव चरणी ।। जय ।। ४।।

**दशावतार आरती**

आरती सप्रेम जय जय विठ्ठल परब्रह्म ।
भक्तसंकटीं नाना स्वरूपीं स्थापिसी स्वधर्म ।। धृ।।

अंबऋषीकारणें गर्भवास सोशीसी ।
वेद नेले चोरूनी ब्रह्मा आणुनियां देसी ।।
मत्स्यरूपी नारायण सप्तही सागर धुंडीसी ।
हस्त लागतां शंखासुरा तुझा वर देसी ।। १।।

रसातळाशीं जातां पृथ्वी पाठीवर घेसी ।
परोपकारासाठीं देवा कांसव झालासी ।।
दाढें धरूनी पृथ्वी नेतां वराहरूप होसी ।
प्रल्हादाकारणें स्तंभीं नरहरि गुरगुरसी ।। २।।

पांचवे अवतारीं बळिच्या द्वाराला जासी ।
भिक्षे स्थळ मागुनी बळिला पाताळीं नेसी ।।
सर्व समर्पण केलें म्हणउनि प्रसन्न त्या होसी ।।
वामनरूप धरूनी बळिच्याद्वारीं तिष्ठसी ।। ३।।

सहस्त्रार्जुन मातला जमदग्नीचा वध केला ।
कष्टीं ते रेणुका म्हणुनी सहस्त्रार्जुन वधिला ।।
निःक्षत्री पृथ्वी दान दिधली विप्राला ।
सहावा अवतार परशुराम प्रगटला ।। ४।।

मातला रावण सर्वां उपद्रव केला ।
तेहतीस कोटी देव बंदीं हरलें सीतेला ।।
पितृवचनालागीं रामें वनवास केला ।
मिळोनी वानर सहित राजाराम प्रगटला ।। ५।।

देवकीवसुदेव बंदीमोचन त्वां केलें ।
नंदाघरीं जाउन निजसुख गोकुळा दिधलें ।।
गोरसचोरी करीतां नवलक्ष गोपाळ मिळविले ।
गोपिकांचें प्रेम देखुनि श्रीकृष्ण भुलले ।। ६ ।।

बौद्ध कलंकी कलियुगिं । झाला अधर्म हा अवघा ।
सांडुनि नित्यधर्म सोडुनि नंदाची सेवा ।।
म्लेंच्छमर्दन करिसी म्हणुनि कलंकी केशवा ।
बहिरवि जान्हवि द्यावि निजसुखानंदसेवा ।। ७ ।।

**श्रीरामदासांची आरती**

आरती रामदासा । भक्त विरक्त ईशा ।।
उगवला ज्ञानसूर्य । उजळोनी प्रकाशा ।। धृ ।।
साक्षात् शंकराचा । अवतार मारुती ।।
कलिमाजीं तेचि जाली । रामदासाची मूर्ती ।। १।।
वीसही दशकांचा । दासबोध ग्रंथ केला ।।
जडजीवां उद्धरीलें । नृप शिवासी तारिलें ।। २।।
ब्रह्मचर्य व्रत ज्याचें । रामरूप सृष्टि पाहे ।
कल्याण तिहीं लोकीं । समर्थ सद्गुरुपाय ।। ३।।

**दासबोधांची आरती**

वेदांतसंमतीचा काव्यसिंधू भरला ।
श्रुतिशास्त्रग्रंथ साक्ष संगमू केला ।।
महानुभव संतजनी अनुभव चाखियला ।
अज्ञान जड जीवां मार्ग सुगम केला ।। १।।

जय जयाजी दासबोधा ग्रंथराज प्रसिद्धा ।
आरती ओंवाळीन विमलज्ञान बाळबोधा ।। धृ ।।

नवविधा भक्तिपंथें रामरूपानुभवी ।
चातुर्यनिधि मोठा मायाचक्र उघवी ।।
हरिहर ह्रदयींचे गुह्य प्रगट दावीं ।
बद्धची सिद्ध झाले असंख्यात मानवी ।। जय ।। २।।

वीसही दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेमें विवरीतां स्वयें ब्रह्मची होये ।।
अपार पुण्य गांठी तरी श्रवण लाही ।
कल्याण लेखकाचे भावगर्भ ह्रदयीं ।। जय ।। ३।।

**श्री ज्ञानेश्वरांची आरती**

आरती ज्ञानराजा महाकैवल्य तेजा
सेविती साधुसन्त मनू वेधला माझा  ।। १।। आरती

लोपले ज्ञान जगीरु हित नेणती कोणीरु
अवतार पांदुरंगरु नाम ठेवीले ज्ञनी ।। २।। आरती

कनकाचे ताट करीरु उभ्या गोपिका नारीरु
नारद तुम्बरहूरु साम गायन करी ।। ३।। आरती

प्रकट गुह्य बोलेरु विश्व ब्रह्मची केलेरु
रामा जनार्दनीरु पायी टकची ठेले ।। ४।। आरती

**श्रीतुकारामांची आरती १**

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरुधामा ।।
सच्चिदानंद मूर्ती । पाय दाखवी आम्हां ।। धृ।।
राघवें सागरांत । पाषाण तारीले । ।

तैसे हे तुकोबाचे । अभंग उदकीं रक्षिले ।। १।।
तुकितां तुलनेसी । ब्रह्म तुकासी आलें ।।
म्हणुनी रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ।। २।।

**श्री तुकारामांची आरती २**

प्रपंञ्चरचना सर्वहि भोगूनि त्यागिली ।
अनुतापाचे ज्वाळी देहबुद्धि हरविली ।।
वैराग्याची निष्ठा प्रगटुनि दाखविली ।
अहंममता दवडुनि निजशान्ती वरिली ।। १।।

जय जयाजी सद्गुरु तुकया दातारा ।
तारक तू सकळांचा जिवलग सोयरा ।। धृ।।

हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला ।
विरक्त ज्ञानाचा ठेवा उघडुनि दाखविला ।।
जगदुद्धारालागीं उपाय सुचविला ।
निंदक दुर्जनाचा संदेह निरसीला ।। धृ।। २।।

तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं ।
कोरड्याचि काढुनि दाखविल्या शेखी ।।
अपार कविताशक्ति मिणवुनि इहलोकीं ।
कीर्तन श्रवणें तुमच्या उद्धरति जन लोकीं ।। धृ।। ३।।

बाळवे घेऊनि श्रीहरी भेटला ।
विधि जनिता तोचि आठव हा दीधला ।।
तेणें ब्रह्मानन्दे प्रेमा डोलविला ।
न तुके म्हणोनि तुका नामीं गौरविला ।। धृ।। ४।।

प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें ।
कळिच्या काळामाजी अद्भुत वर्तविलें ।।
मानव देह घेऊनि निजधामा गेले ।
निळा म्हणे सकळ संत तोषविले ।। धृ।। ५।।

**श्रीनामदेवांची आरती**

जन्मतां पांडुरंगे जिव्हेवरी लिहिलें ।
अभंग शतकोटी प्रमाण कवित्व रचिले ।।१।।

जय जयाजी भक्तराया जिवलग नामया ।
आरती ओंवाळीतां चित्त पालटे काया ।। धृ ।।

घ्यावया भक्तिसुख पांडुरंगे अवतार ।
धरूनियां तीर्थमेषें केला जगाचा उद्धार ।। जय ।। २।।

प्रत्यक्ष प्रचितीं हे वाळवंट परिस केली ।
हारपली विषमता द्वैतबुद्धि निरसली ।। जय ।। ३।।

समाधि महाद्वारी श्रीविठ्ठलचरणीं ।
आरती ओंवाळीतों परिसा कर जोडुनी ।। जय ।। ४।।

**श्री एकनाथांची आरती**

आरती एकनाथा । महाराजा समर्था ।।
त्रिभुवनीं तूंचि थोर । जगद्गुरु जगन्नाथा ।। धृ।।
एकनाथ नाम सार । वेदशास्त्रांचें गूज ।।
संसारदु:ख नास । महामंत्राचें बीज ।। १।।
एकनाथ नाम घेतां । सुख वाटलें चित्ता ।।
अनंत गोपाळदासा । धणी न पुरे गातां ।। २।।

**संतजनांची आरती**

आरती संतमंडळी ।।
हातीं घेउनिं पुष्पांजली ओंवाळिन पंचप्राणें ।।
त्याचे चरण न्याहाळी ।। धृ।।

मच्छेंद्र गोरख । गैनी निवृत्तिनाथ ।
ज्ञानदेव नामदेव । खेचर विसोबा संत ।
सोपान चांगदेव । गोरा जगमित्र भक्त ।
कबीर पाठक नामा । चोखा परसा भागवत ।। आरती ।। १।।

भानुदास कृष्णदास । वडवळसिद्ध नागनाथ ।
बहिरा पिसा मुकुंदराज । केशवस्वामी सूरदास ।
रंगनाथ वामनस्वामी । जनजसवंत दास ।। ।। २।।

एकनाथ रामदास । यांचा हरि पदीं वास ।
गुरुकृपा संपादिली । स्वामी जनार्दन त्यास ।
मीराबाई मुक्ताबाई । बहिणाबाई उदास ।
सोनार नरहरी हा । माळी सांवता दास ।। ३।।

रोहिदास संताबाई । जनी राजाई गोणाई ।
जोगापरमानंदसाल्या । शेखमहंमद भाई ।
निंबराज बोधराज । माथा तयांचें पायीं ।
कूर्मदास शिवदास । मलुकदास कर्माबाई ।। ४।।

नारा म्हादा गोंदा विठा । प्रेमळ दामाजी ।
तुकोबा गणेशनाथ । सेना नरसी महत ।
तुलसीदास कसांबया । पवार संतोबा भक्त ।
महिपती तुम्हां पासी । चरणसेवा मागत ।। ५।।

**श्रीपादवल्लभाची आरती**

दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ।
आरती हे तव चरणी राहो ।
आरती हे तव चरणी राहो ।। नति तति गुरुवरा।।
दिग्भिरवेष्टितमंबरमेव प्रत्यग्ब्रह्मेति ।
खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति ।
खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति ।। दिगंबराचेति ।। १।।
दिगवत् चांबरमेव व्यापक पूर्णब्रह्मेति ।
सच्चित्सुखघनमायातीत ।
सच्चित्सुखघनमायातीत दिगंबरा वदति ।। २।।
श्रीपादवल्लभ नाम प्राप हि नक्रगजेन्द्रमिव ।
द्रोपद्यंबरीषचोर ।
द्रोपद्यंबरीषचोर ग्रसितद्विजमेव ।। ३।।
दिगंबरा गुरु वासुदेव दत्तस्त्वं ब्रह्म ।
कामक्रोधग्रसितं मां लभ ।।
कामक्रोध ग्रसितं मां लभ तथैव झटिति वह ।। ४।।

**श्रीशनिदेवाची आरती**

जय जय श्रीशनिदेवा । पद्मकर शिरीं ठेवा ।।
आरती ओवाळितों । मनोभावें करूनी सेवा ।। धृ।।
सूर्यसूता शनिमूर्ती । तुझी अगाध कीर्ती ।।
एक मुखें काय वर्णूं । शेषा न चले स्फूर्ती ।। १।।
नवग्रहामाजीं श्रेष्ठ । पराक्रम थोर तुझा ।।
ज्यावरी कृपा करिसी । होय रंकाचा राजा ।। २।।
विक्रमासारिखा हो । शककर्ता पुण्यराशी ।।
गर्व धरितां शिक्षा केली । बहु छळियलें त्यासी ।। ३।।
शंकराच्या वरदानें । गर्व रावणें केला ।।
साडेसाती येतां त्यासी । समूळ नाशासी नेला ।। ४।।
प्रत्यक्ष गुरुनाथा । चमत्कार दावियेला ।।
नेऊनी शूलापाशी । पुन्हा सन्मान केला ।। ५।।
ऐसे गुण किती गाऊं । धणी न पुरे गातां ।।
कृपा करी दीनावरी । महाराजा समर्था ।। ६।।
दोन्ही कर जोडूनियां । रखमां लीन सदा पायीं ।।
प्रसाद हाचि मागे । उदयकाळ सौख्य दावीं ।। ७।।

**श्री मंगळागौरीची आरती**

जय देवी मंगळागौरी । ओंवाळीन सोनियातार्टी ।।
रत्नांचे दिवे । माणिकांच्या वाती । हिरेया ज्योती ।। धृ।।
मंगळमूर्ती उपजली कार्या । प्रसन्न झाली अल्पायुषी राया ।।
तिष्ठली राज्यबाळी । अयोषण द्यावया ।। १।।
पूजेला ग आणिती जाईजुईच्या कळ्या । सोळा तिकटीं सोळा दूर्वा ।।
सोळा परींची पत्री । जाई जुई आबुल्या शेवंती नागचांफे ।।
पारिजातकें मनोहरें । नंदेटें तगरें । पूजेला ग आणिली ।। २।।
साळीचे तांदुळ मुगाची डाळ । आळणीं खिचडी रांधिती नारी ।।
आपुल्या पतीलागीं सेवा करिती फार ।। ३।।
डुमडुमें डुमडुमें वाजंत्री वाजती । कळावी कांकणें गौरीला शोभती ।।
शोभली बाजुबंद । कानीं कापांचे गवे । ल्यायिली अंबा शोभे ।। ४।।
न्हाउनी माखुनी मौनी बैसली । पाटाबाची चोळी क्षीरोदक नेसली ।।
स्वच्छ बहुत होउनी अंबा पुजूं लागली ।। ५।।
सोनिया तार्टी घातिल्या पंचारती । मध्यें उजळती कापुराच्या वाती ।।
करा धूप दीप । आतां नैवेद्य षड्रस पक्वानें । तर्टी भरा बोनें ।। ६।।
लवलाहें तिघें काशीसी निघाली । माउली मंगळागौर भिजवूं विसरली ।।
मागुती परतुनीयां आली । अंबा स्वयंभू देखिली । ।
देउळ सोनियाचे । खांब हिरेयांचे । कळस वरती मोतियांचा ।। ७।।

**श्रीहरितालिकेची आरती**

जयदेवी हरितालिके । सखी पार्वती अंबिके ।।
आरती ओवाळीतें । ज्ञानदीपकळिके ।। धृ।।
हरअर्धांगीं वससी । जासी यज्ञा माहेरासि ।।
तेथें अपमान पावसी । यज्ञकुंडींत गुप्त होसी ।। १।।
रिघसी हिमाद्रीच्या पोटी । कन्या होसी तू गोमटी ।।
उग्र तपश्चर्या मोठी । आचरसी उठाउठी ।। २।।
तापपंचाग्निसाधनें । धूम्रपानें अधोवदनें ।।
केली बहू उपोषणें । शंभु भ्रतारकारणे ं ।। ३।।
लीला दाखविसी दृष्टी । हें व्रत करिसी लोकांसाठीं ।।
पुन्हा वरिसी धूर्जटी । मज रक्षावें संकटीं ।। ४।।
काय वर्णू तव गुण । अल्पमति नारायण ।।
मातें दाखवीं चरण । चुकवावें जन्म मरण ।। ५।।

**वटसावित्रीची आरती**

अश्वपती पुसता झाला । नारद सांगताती तयाला ।।
अल्पायुषी सत्यवंत । सावित्रीनें का प्रणीला ।।
आणखी वर वरी बाळे । मनीं निश्चय जो केला ।।
आरती वडराजा ।। १।।
दयावंत यमदूजा । सत्यवंत ही सावित्री ।।
भावे करीन मी पूजा । आरती वडराजा ।। धृ।।
ज्येष्ठामास त्रयोदशी । करिती पूजन वडाशीं ।।
त्रिरात्र व्रत करूनीया । जिंकी तूं सत्यवंताशी ।
आरती वडराजा ।। २।।
स्वर्गावरी जाऊनियां । अग्निखांब कचळीला ।।
धर्मराजा उचकला। हत्या घालील जीवाला ।
येई ग पतिव्रते ।। पती नेई गे आपुला ।।
आरती वडराजा ।। ३।।
जाऊनियां यमापाशीं । मागतसे आपुला पती ।।
चारी वर देऊनियां । दयावंता द्यावा पती ।।
आरती वडराजा ।। ४।।
पतिव्रते तुझी कीर्ति । ऐकुनी ज्या नारी ।।
तुझें व्रतें आचरती । तुझी भुवनें पावती ।।
आरती वडराजा ।। ५।।
पतिव्रते तुझी स्तुती । त्रिभुवनी ज्या करिती ।।
स्वर्गी पुष्पवृष्टी । करुनियां आणिलासी आपुला पती ।
अभय देऊनियां । पतिव्रते तारी त्यासी ।। ६।।

**तुळशीची आरती**

जय देवी जय देवी जय तुळसी ।
निजपत्राहुनि लघुतर त्रिभुवन हे तुळिसी ।। धृ।।
ब्रह्मा केवळ मुळीं मध्यें तो शौरी ।
अग्रीं शंकर तीर्थें शाखा परिवारीं ।।
सेवा करिती भावें सकळहि नरनारी ।

दर्शनमात्रें पापें हरती निर्धारीं ।। १।।
शीतळ छाया भूतळव्यापक तूं कैसी ।
मंजिरीची बहु आवड कमळारमणासी ।।
तव दलविरहित विष्णू राहे उपवासी ।

विशेष महिमा तुझा शुभ कार्तिकमासीं ।। २।।
अच्युत माधव केशव पीतांबरधारी ।
तुझिया पूजनकाळीं जो हें उच्चारी ।।
त्यासी देसी संतति संपति सुखकारी ।
गोसावीसुत विनवी मजला तूं तारी ।। ३।।

**कांकड आरती १**

उठा उठा हो साधक । साधा आपुलालें हित ।।
गेला गेला हा नरदेह । मग कैंचा भगवंत ।। १।।
उठा उठा हो वेगेंसीं । चला जाऊं राऊळासी ।।
हरतिल पातकांच्या राशी । कांकड आरती पाहोनी ।। धृ।।
उठोनियां हो पाहाटें । पाहा विठ्ठल उभा विटे ।।
चरण तयाचे गोमटे । अमृतदृष्टीं अवलोका ।। २।।
जागें करा रुक्मिणीवरा । देव आहे निजसुरा ।।
वेगें निंबलोण करा । दृष्ट होईल तयासी ।। ३।।
पुढें वाजंत्री । ढोल दमामे गर्जती ।।
होत कांकड आरती । माझ्या पंढरीरायाची ।। ४।।
सिंहनाद शंख भेरी । गजर होतो महाद्वारीं ।।
केशवराज विटेवरी । नामा चरण वंदितो ।। ५।।

**कांकड आरती २**

भक्तीचिये पोटी बोध कांकडा ज्योती ।
पंचप्राण जीवेंभावें ओवाळूं आरती ।। १।।
ओवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा ।
दोन्ही कर जोडूनि चरणीं ठेविला माथा ।। धृ।।
काय महिमा वर्णू आतां सांगणें तें किती ।
कोटी ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ।। २।।
राही रखुमाबाई उभ्या दोन्ही दों बाहीं ।
मयूरपिच्छचामरें ढाळिती ठाईंच्या ठाई ।। ३।।
विटेसहित पाय म्हणुनी भावें ओवाळूं ।
कोटी रवि शशी दिव्य उगवले हेळू ।। ४।।
तुका म्हणे दीप घेउनी उन्मनींत शोभा ।
विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ।। ५।।

**कांकड आरती ३**

काकड आरती परमात्मया श्रीरघुपती ।
जीवशिव ओवाळीन निर्जी निजात्मज्योती ।। धृ ।।

त्रिगुण काकडा द्वैतघृतं तिंबिला ।
उजळीतों आत्मज्योती तेणें प्रकाशला ।। काकड ।। १।।

काजळी तामस अवघें तेज डळमळ ।
अवनी आवर अवघा निग निज निश्चळ ।। काकड ।। २।।

उदय ना अस्त जेथें बोध प्रातःकाळीं ।
रामी रामदास सहजीं सहज ओंवाळी ।। काकड ।। ३।।

**पंचायतन आरती**

अघसंकटभयनाशन सुखदा विघ्नेशा ।
आद्या सुरवरवंद्या नरवारण वेशा ।।
पाशांकुशधर सुंदर पुरवीसी आशा ।
निजवर देऊनि हरिसी भ्रांतीच्या पाशा ।। ।। १।।

जय देव जय देव जय सुखकर मूर्ती ।
गणपति हरी शिवभास्कर अंबा सुखमूर्ती ।। धृ ।।

पयसागरजाकांता धरणीधरशयना ।
करुणालय वारिसि भववारिजदलनयना ।।
गरुडध्वज भजन प्रिय पीतप्रभवसना ।
अनुदिनिं तव कीर्तनरस चाखो हे रसना ।। जय ।। २।।

नंदीवहना गहना पार्वतिच्या रमणा ।
मन्मथदहना शंभो वातातमजनयना ।।
सर्वोपाय विवर्जित तापत्रयशमना ।
कैलासाचलवासा करिसी सुरनमना ।। जय ।। ३।।

पद्मबोधकरणा नेत्रभ्रमहरणा ।
गोधन बंधनहरता द्योतक आचरणा ।।
किरण स्पर्शें वारिसि या तम आवरणा ।
शरणागत भयनाशन सुखवर्धनकरणा ।। जय ।। ४।।

त्रिभुवनउत्पति पालन करिसीइ तूं माया ।
नाहीं तुझिया रूपा दुसरी उपमा या ।।
तुझा गुणगणमहिमा न कळे निगमा या ।
करुणा करिसी अंबे मनविश्रामा ।। जय ।। ५।।

**धूपारती**

जय देव जय देव पंढरीराया ।
धूप अर्पीतसें मी भावें तव पायां ।। धृ।।
सोज्ज्वळ अग्निरूप निजतेजोराशी ।
अहंभाव धूप कृपें जाळीसी ।।
त्याचा आनंद माझे मानसीं ।
तव दर्शनमोदें सुख हें सर्वांसी ।। १।।
पूर्णानंद देवा तूं सच्चिदानंदा ।
परमात्मा तूं अससी आनंदकंदा ।।
पूर्ण करीं तूंची भक्तांच्या छंदा ।
अंगीकारुन धूप दे ब्रह्मानंदा ।। २।।

**दीपारती**

जय देव जय देव जय पांडुरंगा ।
दीपारति ओवाळूं तुजला जिवलगा ।। धृ।।
स्वयंप्रकाशा तूझी सर्वही दीप्ति।।
पूर्णानंद प्राप्त करितां तव भक्ति ।।
देहत्रय वाती पाजळोनी प्रीती ।
ओवाळितों प्रेमें देवा तुजप्रती ।। १।।
देव तुज पाहता येतो प्रेमपूर ।
नाम निरंतर गातां होतो भवपार ।।
वाटे तव भक्ती ही प्रियकर ।
विष्णुदासा देई अखंड हा वर ।। २।।

**नैवेद्य आरती**

जय देव जय देव जय विठाबाई ।
पक्वान्नादी सिद्धी अर्पी तुज ठायीं ।। धृ।।
षड्रसपक्वान्नें हीं अर्पित तुज माई ।
कृपा करुनी तीं तूं मान्य करुनि घेई ।।
तृप्ती सर्व जीवां जेवितां तूं आई ।
जीवन सर्वांचें हें असे तव पायीं ।। १।।
आनंदें भोजन करावें आतां ।
यथेच्छ जेवूनी उच्छिष्ट उरतां ।।
प्रसाद तो देई आपुल्या भक्ता ।
हेंचि मागें ठेवूनि तव चरणीं माथा ।। २।।

**नीरांजन आरती**

पंचप्राणांचें नीरांजन करुनी ।
पंचतत्त्वें वाती परिपूर्ण भरुनी ।।
मोहममतेनें समूळ भिजवोनी ।
अपरोक्ष प्रकाश दीप पाजळोनी ।। १।।
जय देव जय देव जय नीरांजना ।
नीरांजन ओवाळूं तुझिया समचरणा ।। धृ।।
ज्वाला ना काजळी दिवस न राती ।
सदोदित प्रकाश भक्तीनें प्राप्ती ।।
पूर्णानंदें धालों बोलों मी किती ।
उजळों हे शिवराम भावें ओंवाळीती ।। २।। ।। धृ।।

**कर्पूरारती**

कर्पूरगौरा । करुणावतारा ।
संसारसारा । भुजगेन्द्रहारा ।।
सदा रहासी हृदयारविंदीं ।
भवा भवानीसह तूज वंदीं ।।

**निरोप आरती**

जाहलें भजन आम्ही नमितों चरणा । नमितों तव चरणा ।
वारुनिया विघ्नें देवा रक्षावे दीना ।। धृ।।
दास तुझे आम्ही देवा तुजलाची ध्यातों । देवा तुजलाची ध्यातों ।
प्रेमें करुनियां देवा गुण तुझे गातों ।। १।।
तरी न्यावी सिद्धी देवा हेची वासना । देवा हेची वासना ।
रक्षूनियां सर्वां द्यावी आम्हासी आज्ञा ।। २।।
मागणें तें देवा आतां एकची आहे । आतां एकची आहे ।
तरुनियां सकळां आम्हां कृपादृष्टी पाहें ।। ३।।
जेव्हां सर्व आम्ही मिळूं ऐशा या ठाया । ऐशा या ठाया ।
प्रेमानंदें लागू तुझी कीर्ती गावया ।। ४।।
सदा ऐशी भक्ती राहो आमुच्या मनीं । आमुच्या मनीं ।
हेची देवा तुम्हा असे नित्य विनवणी ।। ५।।
वारुनियां संकटें आतां आमुचीं सारी। आतां आमुची सारी ।
कृपेची साउली देवा दीनावरि करीं ।। ६।।
निरंतर आमुची चिंता तुम्हां असावी । चिंता तुम्हा असावी ।
सर्वांची लज्जा देवा तुम्ही रक्षावी ।। ७।।
निरोप घेतों आतां आम्हां आज्ञा असावी ।
चुकलें आमुचें कांहीं त्याची क्षमा असावी ।।

**गजानन महाराजांची आरती**

जय जय सच्चित्स्वरूप स्वामी गणराया ।
अवतरलासी भूवर जड मूढ ताराया ।। धृ।।
निर्गुण ब्रह्म सनातन अव्यय अविनाशी ।
स्थिरचर व्यापुन उरले जे या जगतासी ।।
तें तूं खरोखर निःसंशय अससी ।
लीलामात्रें धरिलें मानव देहासी ।। १।।
होऊं न देशी त्याची जाणिव तूं कवणा ।
करुनी गणि गण गणात बोते या भजना ।।
धाता हरिहर गुरुवर तूंचि सुखसदना ।
जिकडे पहावे तिकडे तूं दिससी नयना ।। २।।
लीला अनंत केल्या बकटसदनास।
पेटविले त्या अग्नीवांचुनि चिलमेस ।।
क्षणांत आणिले जीवन निर्जल वापीस ।
केला ब्रह्मगिरीच्या गर्वाचा नाश ।। ३।।
व्याधि वारुन केले कैंकां संपन्न ।
करविलें भक्तांलागी विठ्ठल दर्शन ।।
भवसिंधु हा तरण्या नौका तव चरण ।
स्वामी दासगणूचे मान्य करा कवन ।। ४।।

**घालिन लोटांगण**

घालीन लोटांगण वंदीन चरण ।
डोळ्यांनी पाहिन रूप तुझे ।
प्रेमें आलिंगीन आनंद पूजन ।
भावे ओवाळिन म्हणे नामा ।।

त्वमेव माता पिता त्वमेव ।
त्वमेव बन्धु: सखा त्वमेव ।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव ।
त्वमेव सर्वं मम देवदेव ।।

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा ।
बुध्यात्मना वा प्रकृति स्वभावात् ।
करोमि यद्यत् सकलं परस्मै ।
नारायणायेती समर्पयामि ।।

अच्युतं केशवं राम नारायणम् ।
कृष्णदामोदरं वासुदेवं भजे ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभम् ।
जानकीनायकं रामचंद्रं भजे ।।

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।

**।।मंगलमुर्ती मोरया।।**
**।।गणपतिबाप्पा मोरया।।**

**गणपति श्लोक**

ॐ गणानां त्वा गणपतिं हवामहे ।
कविं कविनां उपमश्रवस्तमम् ।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आनः ।
शृण्वन् ऊतिभिः सीदसादनम् ।।

**मंत्र पुष्पांजली**

ॐ यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचंत यत्र पूर्वे साध्याः संति देवाः ।।
ॐ राजाधिराजाय प्रसह्य साहिने ।
नमो वयं वैश्रवणाय कुर्महे ।
स मे कामान् काम कामाय मह्यं ।
कामेश्वरो वैश्रवणो ददातु कुबेराय वैश्रवणाय ।
महाराजाय नमः ।
ॐ स्वस्ति । साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं
वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यमाधिपत्यमयं
समंतपर्यायीस्यात् सार्वभौमः सार्वायुष आं
तादापरार्धात् पृथिव्यै समुद्रपर्यंताया एकेराळिति ।
तदप्येषः श्लोकोऽभिगीतो मरुतः परिवेष्टारो
मरुतस्यावसन् गृहे ।
आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ।।

एकदंतायविद्महे वक्रतुण्डाय धीमहि ।
तन्नोदंती प्रचोदयात् ।

**।। मंत्रपुष्पांजली समर्पयामि ।।**

**।। गणपतिबाप्पा मोरया ।।**